**राज्यातील अल्पसंख्याकांच्या समस्यांबाबत संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी देण्याकरिता अनुदान वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१४/प्र.क्र.१६२/का-९**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ३१/१२/२०१४

वाचा —

1) **शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२००९/प्र.क्र.५७/०९/ का-१, दि. ०५ फेब्रुवारी, २००९,**
2) **शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१४/प्र.क्र.६१४ /१४/का.७, दि.१०/०६/२०१४**
3) **सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.राअआ/ संकिर्ण/ २२९०/ २०१४, दि.१९/११/२०१४.**

**शासन निर्णय—**

संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये, "राज्यातील अल्पसंख्याकांच्या समस्यांबाबत संशोधन, अल्पसंख्याकांची निगडीत बाबी हाताळणारे प्रशासनातील अधिकारी/ कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण व राज्य शासनाने अल्पसंख्याकांसाठी घोषित केलेल्या योजनांना प्रसिध्दी"ही योजना कार्यान्वित करण्यात आली आहे. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात या योजनेच्या अंमलबजावणीसाठी "मागणी क्र. झेड ई-ए, मुख्य लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण २०० व इतर कार्यक्रम २०० व इतर कार्यक्रम, राज्य योजनेंतर्गत योजना (०१) (०१२) अल्पसंख्याकांच्या समस्यांबाबत संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी देण्याकरिता सहाय्यक अनुदान (२२३५-ए-१८७)) या लेखाशीर्षाखाली रु. ४ कोटी इतका नियतव्यय मान्य असून, संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये चालू वर्षात या योजनेच्या अंमलबजावणीसाठी रु.२५,००,००० इतकी तरतूद वितरित करण्यासाठी मान्यता प्रदान करण्यात आली होती.

२. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुसरुन सन २०१४-१५ या वर्षात अल्पसंख्याकांच्या समस्यांबाबत संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी देणे या योजनेच्या अंमलबजावणीकरीता रु.४,००,००,०००/- (रुपये चार कोटी फक्त) इतक्या निधीमधून वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये ६०% मर्यादेपर्यंत रु. २,८०,००,०००/- (रुपये दोन कोटी ऐंशी लाख फक्त) निधीमधून रु. १,४३,००,०००/- (रुपये एक कोटी त्रेचाळीस लाख फक्त) एवढा निधी वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्या स्वाधीन करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांना सन २०१४-१५ करिता मंजूर करण्यात आलेल्या एकूण रु. १,४३,००,०००/- (रुपये एक कोटी त्रेचाळीस लाख फक्त) एवढया निधीच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. रु. १,४३,००,०००/- (रुपये एक कोटी त्रेचाळीस लाख फक्त) एवढया रकमेचा धनादेश "सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई" यांच्या नावाने काढण्यात यावा. या आदेशान्वये वितरित करण्यात आलेल्या निधीमधून केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने शासनास सादर करावे. सदरहू अनुदान वितरीत करताना वित्तीय नियम /विनियम/शासन निर्णय महालेखाकार यांचे निरीक्षण अहवाल इ.ची तपासणी करुन आयोगाने अनुदान वितरित करावे त्याचप्रमाणे संदर्भ क्र.३ येथील दिनांक ०१.०७.२०१४ च्या शासन परिपत्रकाव्दारे विहीत केलेल्या सर्व अटी व शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगावर राहील.

४. या योजनेंतर्गत होणारा खर्च मागणी क्र. झेड ई-ए, मुख्य लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण २०० व इतर कार्यक्रम २०० व इतर कार्यक्रम, राज्य योजनेंतर्गत योजना (०१) (०१२) अल्पसंख्याकांच्या समस्यांबाबत संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी देण्याकरिता सहाय्यक अनुदान (२२३५-ए-१८७) या लेशाशीर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय नियोजन विभागाने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३७४/१४७५, दि.०२/१२/२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीस तसेच वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्र.११०९/१४/व्यय-४, दि.०९/१२/२०१४ अन्वये प्राप्त अभिप्रायानुसार प्रशासकिय विभागास असलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०२१०५०३७७९१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANGURDE SANJAY SURYAKANT

Digitally signed by GANGURDE SANJAY SURYAKANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT,CID - 919995, postalCode=400032, st=Maharashtra, cn=GANGURDE SANJAY SURYAKANT
Date: 2015.01.02 10:59:07 +05'30'

**( सं. सु. गांगुर्डे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोग, मुंबई.

२. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखावअनुज्ञेयता), मुंबई / नागपूर

३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
४. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई,
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६. नियोजन विभाग (१४७५)/ वित्त विभाग (व्यय-४)
७. अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती.